महाराष्ट्र राज्य, सायबर कार्यालयासाठी जागतिक व्यापार केंद्र, कफपरेड, मुंबई येथील एकुण १०४६९ चौ. फुट जागेचे माहे एप्रिल-२०२४ ते माहे मार्च-२०२५ या कालावधीतील भाडे देयक रू.३,६२,४७, ३००/-इतका निधी अदा करण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.संकीर्ण-०९२३/प्र.क्र.१६४/विशा-३(अ)
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक: २६ मार्च, २०२५

संदर्भ:-

१) शासन निर्णय,संकीर्ण-२०१५/प्र.क्र.११९/विशा-३अ,दि.०५.०१.२०१६
२) शासन निर्णय,संकीर्ण-२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.०९.०३.२०१६
३) शासन निर्णय,संकीर्ण-२०१६/प्र.क्र.०५/विशा-३अ,दि.०७.०४.२०१६
४) शासन निर्णय,संकीर्ण-०९२३/प्र.क्र.१६४/विशा-३अ,दि.१९.०३.२०२५
५) पोलीस अधीक्षक, अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांचे पत्र क्र. विपोमनि/सायबर व मअप/भाडेकरार/२०२५-१३५१, दि.१९.०३.२०२५

प्रस्तावना:-

दि ०५.०१.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विशेष पोलीस महानिरीक्षक यांच्या अधिनस्त सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्षाची स्थापना करण्यात आली. तद्नंतर दि ०९.०३.२०१६ व दि ०७.०४.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये अन्वये सायबर कार्यालयासाठी जागतिक व्यापार केंद्र, मुंबई येथील एकूण १०,४६९ चौ फूट (८४६९ चौ फूट सायबर व महिला अत्याचार कक्षासाठी २००० चौ फूट आर्थिक गुन्हे शाखेसाठी) इतकी जागा भाड्याने घेण्यास मान्यता देण्यात आली.

शासनाच्या वतीने विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर, मुंबई व M.Visvesvaraya Industrial Research and Development Centre या संस्थेमध्ये दि.१४.०३.२०२४ ते दि.१३.०३.२०२५ भाडे करार करण्यास दि.१९.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्य सायबर कार्यालयाने उपरोक्त संदर्भाधीन पत्र क्र.५ अन्वये माहे एप्रिल-२०२४ ते माहे मार्च-२०२५ या कालावधीतील भाडेकराराची परिगणना करून शासनास सादर केली आहे.

त्यानुषंगाने सदर निधी M. Visvesvaraya Industrial Research and Development Centre या संस्थेस भाड्यापोटी देण्यासाठी महाराष्ट्र राज्य, सायबर कार्यालयास रू.३,६२,४७, ३००/-इतका निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य, सायबर कार्यालयासाठी जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई येथे भाडेतत्त्वावर उपलब्ध करून दिलेल्या जागेचे **माहे एप्रिल-२०२४ ते माहे मार्च-२०२५ या** कालावधीतील देय असलेल्या कार्यालयीन भाड्याचे **रू. ३, ६२, ४७, ३००/- (अक्षरी रूपये तीन कोटी बासष्ठ लक्ष ,सत्तेचाळीस हजार, तीनशे फक्त )** एवढ्या रकमेचे देयक जागतिक व्यापार केंद्रास अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू देयकाचा तपशिल पुढील प्रमाणे आहे:-

| अ.क्र. | महिना | Compensation A.C. Area | Comman Outgoing A.C. Area | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | एप्रिल-२०२४ | २७७९५१९.४६ | २४२७४४.६९ | ३०,२२,२६४.१५ |
| २ | मे-२०२४ | २७७९५१९.४६ | २४२७४४.६९ | ३०,२२,२६४.१५ |
| ३ | जुन-२०२४ | २७७९५१९.४६ | २४२७४४.६९ | ३०,२२,२६४.१५ |
| ४ | जुलै-२०२४ | २७७९५१९.४६ | २४२७४४.६९ | ३०,२२,२६४.१५ |
| ५ | ऑगस्ट-२०२४ | २७७९५१९.४६ | २४२७४४.६९ | ३०,२२,२६४.१५ |
| ६ | सप्टेंबर-२०२४ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| ७ | ऑक्टोंबर-२०२४ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| ८ | नोव्हेंबर-२०२४ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| ९ | डिंसेबर-२०२४ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| १० | जानेवारी-२०२५ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| ११ | फेब्रुवारी-२०२५ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| १२ | मार्च-२०२५ | २७७९५१९.४६ | २३९९०३.४० | ३०,१९,४२२.१५ |
| **एकूण** | | **३,३३,५४,२३३.५२** | **२८,९३,०४७.०३** | **३,६२,४७,२८०.८** |

२. सदरहू रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून काढण्यास अपर पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य सायबर, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच त्यांनी प्राप्त दयेकातील रक्कमांच्या अचूकतेबाबत व तपशीलाबाबत छाननी करून देयक सादर करावे. तसेच, वरील रक्कमेचा धनादेश M.V.I.R.D.C. World Trade Centre, Mumbai यांचे नावाने काढण्यात यावा.

३. सदर कार्यालयीन भाड्यासाठी येणार उपरोक्त खर्च मागणी क्र. बी-१२०५५ - पोलीस, (००) (००) १०१ गुन्हा अन्वेषण व दक्षता, (००) (०६) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष, योजनेतर (२०५५ A ०२३)" या लेखाशीर्षाखालील, "१४ भाडेपट्टी व इतर खर्च", या उद्दिष्टाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो चालू वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उपरोक्त निधी खर्च करतांना वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ नमूद करण्यात आलेल्या परिच्छेद ५ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनाचे काटेकोर पालन करावे व वेळोवेळी विहीत विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावे.

५. सदर निधीचे वितरणाचे आदेश वित्त विभागाच्या दि.१७.०३.२०२५ रोजीच्या परिपत्रकास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२६१२४२०४१९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWAPNA NILESH DESHPANDE

Digitally signed by SWAPNA NILESH DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=8f33d110713d529fd14cadb7107a7a56252382926dfbbe68e0ce49aae150e1e8, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F68C2CBBE864D14D120F29960E8E60D5C00E2D614E6A0234A132D68EADBD05CC, cn=SWAPNA NILESH DESHPANDE
Date: 2025.03.26 12:43:05 +05'30'

**( स्वप्ना देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य सायबर,मुंबई.
४) संचालक जागतिक व्यापार केंद्र ,कफ परेड,मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कक्ष अधिकारी/बीयुडी-१,गृह विभाग,मुंबई.
९) कक्ष अधिकरी/व्यय-७,वित्त विभाग,मुंबई.
१०) निवड नस्ती, गृह विभाग/ विशा ३ अ